मलकापूर , जिल्हा बुलढाणा येथे स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर या जोड न्यायालयांऐवजी जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मलकापूर ही दोन नियमित न्यायालये कार्यरत करणे आणि या न्यायालयांसाठी पदनिर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत ..........

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सीआरसी १६०८/प्र.क्र.१९६/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २८ जून, २०१८

**वाचा -**

१ शासन निर्णय , विधि व न्याय विभाग क्रमांक सीआरसी १६०८/प्र.क्र.१९६/का.१२, दिनांक १० जानेवारी, २०१८

२ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र.२७/का.६, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६

३ जिल्हा व सत्र न्यायालय बुलढाणा यांचे पत्र जा.क्र.आस्था.३७७/२०१८, दिनांक १९.०१.२०१८

**शासन निर्णय-**

मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १० जानेवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मलकापूर, जिल्हा बुलढाणा येथे स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय मलकापूर आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मलकापूर या दोन न्यायालयांना नियमितरित्या कार्यरत करण्यास व या न्यायालयांसाठी पद निर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील जिल्हा व सत्र न्यायालये आणि त्यांच्या अधिपत्याखालील न्यायालयांमधील अधिक्षक, सहायक अधिक्षक यांना सुधारीत वेतनश्रेणी मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता, संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १९ जानेवारी, २०१८ रोजीच्या पत्रान्वये प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश बुलढाणा यांनी अधिक्षक व सहायक अधिक्षक या पदांच्या वेतनश्रेणीमध्ये संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयामधील तरतुदींस अनुलक्षून सुधारणा करण्याची विनंती केलेली आहे. या विनंतीस अनुलक्षून उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, समक्रमांक दिनांक १० जानेवारी, २०१८ मधील परिच्छेद १ मधील तक्त्यात अधिक्षक या पदाची वेतनश्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० याऐवजी ९३००-३४८०० ग्रेड पे ४६०० अशी वाचण्यात यावी. तसेच, सहायक अधिक्षक या पदाची वेतनश्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे ४२०० याऐवजी ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० अशी वाचण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२८१२०४१३०९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amogh
Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.06.28 12:09:22 +05'30'

(अ. श्यां. कलोती)
विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
५. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
७. सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
९. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१०.प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
११.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,
१२.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,
१३.महालेखापाल १, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
१४.महालेखापाल २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
१८. उपजिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
१९.वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.क., मंत्रालय, मुंबई,
२०. विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने
२१. निवडनस्ती (का.१२)